**केंद्र पुरस्कृत / सहाय्यित योजनांकरिता केंद्र शासनाचा निधी वितरीत करताना केंद्र शासनाकडून निर्गमित करण्यात येणाऱ्या सुधारित मार्गदर्शक सूचनांमधील बदलांच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१७ / प्र. क्र. १० / २०१७ / का - १४१४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०१७

**शासन निर्णय :-**

राज्यास केंद्र पुरस्कृत / केंद्र सहाय्यित योजनांच्या माध्यमातून मोठ्या प्रमाणात अर्थसहाय्य प्राप्त होत असते. केंद्र पुरस्कृत / केंद्र सहाय्यित योजनांचा निधी वापरण्याबाबत केंद्र शासनाकडून वेळोवेळी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत असतात. काही वेळा या सूचनांमध्ये भरीव बदल असतात तर काही वेळा काही किरकोळ बदल सुचविलेले असतात. हे बदल विचारात घेऊन कार्यवाही करावयाची झाल्यास त्यास नियोजन व वित्त विभागाची मान्यता, मा. मुख्य सचिवांची मान्यता, संबंधित विभागाच्या प्रभारी मंत्री महोदयांची मान्यता व आवश्यकतेनुसार मा. मुख्यमंत्री महोदयांची किंवा मंत्रिमंडळाची मान्यता घ्यावी लागते. या प्रमाणे कार्यवाही करावयाची झाल्यास खूप विलंब होतो.

केंद्र शासनाने घोषित केलेल्या राज्यशासनाशी संलग्न विविध विकास योजनांचा अभ्यास करुन केंद्र शासनाकडून मोठ्या प्रमाणात निधी कशाप्रकारे उपलब्ध करता येईल, याबाबत मार्गदर्शन करण्यासाठी दि. ३१.३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय समितीच्या दि. १९.६.२०१७ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार केंद्र पुरस्कृत योजनांकरिता केंद्र शासनाचा निधी वितरीत करताना केंद्र शासनाकडुन निर्गमित केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांमध्ये बदल असल्यास खालीलप्रमाणे कार्यपध्दतीचा स्तर निश्चित करण्यात येत आहे. असे प्रस्ताव मा.मुख्य सचिव, अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) व प्रधान सचिव (नियोजन) यांच्या उच्चस्तरीय समितीसमोर सादर करण्यात यावेत. अशा प्रस्तावांबाबत कार्यवाही करताना मा.मुख्य

सचिव, अपर मुख्य सचिव (वित्त) व प्रधान सचिव (नियोजन) यांची उच्चस्तरीय समिती सदर प्रस्तावांचे खालीलप्रमाणे वर्गीकरण करेल.

(अ) समिती त्यांचे स्तरावर निर्णय घेईल असे प्रस्ताव.

(ब) समितीच्या शिफारशीनुसार मा.मुख्यमंत्री महोदयांची मान्यता घेणे आवश्यक राहील, असे प्रस्ताव.

(क) ज्या प्रस्तावांमध्ये केंद्र व राज्य हिश्याच्या प्रमाणामध्ये बदल झाल्यामुळे राज्य शासनावर फार मोठया प्रमाणावर आर्थिक भार पडणार आहे, किंवा जेथे लाभार्थ्यांच्या संख्येमध्ये मोठया प्रमाणात बदल झालेला असल्यामुळे त्यामधील बदलासंदर्भात मंत्रिमंडळाची मान्यता घेणे आवश्यक राहील असे प्रस्ताव.

वरील (अ) ते (क) मध्ये नमूद कोणत्याही परिस्थितीत संबंधित प्रशासकीय विभागाने त्यांचे प्रस्ताव प्रथमत: मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीच्या निदर्शनास आणावेत. तद्नंतर समिती देईल त्या निदेशानुसार प्रकरणपरत्वे त्यांना मा.मुख्यमंत्री महोदयांची किंवा मंत्रिमंडळाची मान्यता घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा समितीची मान्यता प्राप्त झाल्यावर केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७७/२०१७/व्यय-८ दि.१ ऑगस्ट, २०१७ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०३१०५१५९५६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Pandurang Ghoderao

Digitally signed by Prakash Pandurang Ghoderao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=29f2510a4f56dbc3f173d92c94dfb04ad5ebfa56f73ad817a28d1a956198d293, cn=Prakash Pandurang Ghoderao
Date: 2017.08.03 10:43:20 +05'30'

**(प्रकाश घोडेराव)**
उप सचिव, नियोजन विभाग

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव

३. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव

४. मा. राज्यमंत्री (गृह (ग्रामीण), वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव

५. मा. विरोधी पक्षनेता, विधापरिषद / विधासभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

६. मा. विधापरिषद / विधासभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

९. अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

१०.प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

११.सर्व मंत्रालयीन विभाग

१२.नियोजन विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

१३.नियोजन विभागातील सर्व विकासक्षेत्र कार्यासने

१४. निवडनस्ती (का-१४१४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.